मुंबई जिल्हा महीला कारागृह, भायखळा
येथे स्त्री बंद्यांसाठी तीन मजली इमारत
बांधण्याच्या सुधारीत खर्चास प्रशासकीय
मान्यता देण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक बांधका ०१२०/४/प्र.क्र.१०२, पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक १७ जानेवारी २००५

**वाचा :-** १) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.
बीएलडी/१५९७/१६४०/३४८०/का-३, दि.१३.५.२००४

**शासन निर्णय :-** मुंबई जिल्हा महीला कारागृह, भायखळा , मुंबई येथे स्त्री बंद्यांसाठी दुमजली इमारत बांधण्यात येणाऱ्या रु.१,३५,३५,८६०/- (रुपये एक कोटी पस्तीस लाख पस्तीस हजार आठशे साठ फक्त) च्या सुधारीत खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास प्रस्ताव सादर केला असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. याआधी शासन निर्णय समक्रमांक दिनांक ९ नोव्हेंबर, २००१ अन्वये मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे स्त्री बंद्यांसाठी दुमजली इमारत बांधण्यास येणाऱ्या रु.८५,२५,२६१/- च्या खर्चास प्रशासकीय मान्यता दिलेली होती. तथापि दिनांक २६.११.२००३ रोजी प्रधान सचिव (तुरुंग) यांचे अध्यक्षतेखाली कारागृह उपमहानिरीक्षक, भायखळा, मुंबई यांचे कार्यालयात झालेल्या बांधकामाच्या आढावा घेण्याच्या बैठकीत ठरल्याप्रमाणे याआधी मंजूर जी+१ अशी इमारत बांधण्याऐवजी भविष्यातील २५ वर्षाचा विचार करता जी+२ अशी इमारत बांधण्याचे ठरले. तसेच इमारतीच्या तळमजल्यावर एका विंग मध्ये स्टील्ट देवून स्वच्छता गृहाची व्यवस्था करण्याचे ठरले. त्यामुळे यासाठी मंजूर रु. ८७,९८,२४८/- च्या खर्चामध्ये रु.४७,३७,६१२/- इतकी वाढ होऊन एकूण खर्च रु.१,३५,३५,८६०/- इतका झालेला आहे. उपरोक्त परिस्थिती विचारात घेता शासन या आदेशाद्वारे मुंबई जिल्हा महीला कारागृह, भायखळा , मुंबई येथे स्त्रीबंद्यांसाठी तीन मजली इमारत बांधण्यास येणाऱ्या रु.१,३५,३५,८६०/- (रुपये एक कोटी पस्तीस लाख पस्तीस हजार आठशे साठ फक्त) इतक्या सुधारीत खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास (वित्तीय मान्यता धरुन) प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्यलेखाशिर्ष २०५६, तुरुंग,१०१ तुरुंग (००) (०१) केंद्र पुरस्कृत योजनेतर/ दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र १/३ निधी उपलब्ध झाल्यानंतरच विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार बांधकामास सुरुवात करावी.

४.  हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सीआर ८३५/२००४/व्यय-८, दिनांक ५.११.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ.ग.परदेशी

**(आ.ग. परदेशी)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई
अधिक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह, मुंबई
अधिक्षक, भायखळा जिल्हा कारागृह, मुंबई
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१( लेखा परीक्षा), मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय, मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा. २) मंत्रालय, मुंबई,
अवर सचिव, गृह विभाग, जीयुडी-१, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती/ पीआरएस-२

**********